को.प.बंधारा खडकी ता.अकोले,जि.अहमदनगर योजनेच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.३७९/२०२२)/ सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ०४ मे २०२३

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र.जा.क्र.गोमपाविम/सिंचन-१ /धा-२६८ /२०२२/८३२० दि.२२/०९/२०२२.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/सिंव्य (कामे),दि १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे),दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे),दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना:-**

अकोले तालुक्यातील आदिवासी भागातील को.प.बंधारा खडकी हा मुळा नदीवरील अनुक्रमे दुस-या क्रमांकाचा को.प.बंधारा आहे.बंधा-याचे बांधकाम सन १९९६ मध्ये दगडी बांधकामात पुर्ण करण्यात आलेले आहे.को.प.बंधा-याच्या एकूण गाळयांची संख्या १९ आहे व १८ स्तंभ असून बंधा-याची लांबी ७४ मीटर व नदी तळापासुनची उंची ६.१५ मीटर आहे.बंधा-याची साठवण क्षमता ३९.३० द.ल.घ.फू.असून सिंचन क्षेत्र २६३ हेक्टर इतके असून या बंधा-याव्दारे खडकी बुद्रूक,खडकी खुर्द,पिंप्री व वाजुळशेत इ.गावाना सिंचनाचा लाभ होतो.

दरवर्षी पावसाळयात मुळा नदीला येणा-या पुरामुळे या को.प.बंधा-यांच्या स्तंभाचे मोठया प्रमाणात नुकसान झालेले आहे.तसेच पायातील बांधकामातून देखील पाणी गळती होत असते.त्यामुळे सदर को.प.बंधा-याची तातडीने दुरूस्ती होणे आवश्यक असल्याची बाब निदर्शनास आलेली असून याबाबत लाभधारकांकडून देखील मागणी होत आहे.

खडकी को.प.बंधा-याचे सुरक्षिततेच्या दृष्टीने आवश्यक मजबुतीकरण केल्याने बंधा-यातून होणारी पाणी गळती कमी होवून बंधारा सुरक्षित राहण्यास व प्रत्यक्ष सिंचनक्षेत्रात वाढ होण्यास मदत होणार आहे.

बंधा-याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने खडकी को.प.बंधा-याची दुरूस्ती होणे आवश्यक असल्याने को.प.बंधारा खडकी ता.अकोले,जि. अहमदनगर याचे दुरूस्ती कामास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर (औरंगाबाद) अंतर्गत ता.अकोले,जि.अहमदनगर येथील खडकी कोल्हापूर पध्दतीच्या बंधा-याच्या विशेष दुरूस्ती कामाच्या रू ५१,०८,९८५ /- (रू. एकावन्न लक्ष आठ हजार नऊशे पंच्याऐंशी फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता,निविदा प्रक्रिया,कामाचे नियोजन व पूर्णत्व , प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय अधिका-याची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (००)(१८) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र) (कार्यक्रम) (४७०२ ७४८१) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. २ सन २०२३-२४ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२३०५०४११३१०५६०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: CN = NAMITA GAURAV BASER, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.05.04 11:42:47 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाच्या उपसचिव**

**सोबत : सहपत्र**

**प्रतः-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,

९) अ.मु.स. (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,मुंबई,

१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,नागपूर,

१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर (औरंगाबाद).

१४) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग ,उत्तर महाराष्ट्र प्रदेश ,नाशिक

१५) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१६) अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक,

१७) कार्यकारी अभियंता, अहमदनगर पाटबंधारे विभाग ,अहमदनगर

१८) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.३७९/२०२२)/ सिंव्य (कामे),

दि. ०४/०५/२०२३ चे सहपत्र

| Sr.No. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| १ | C - Works (excluding Royalty) | ४०८३७३७ |
| २ | Royalty | १२६८२६ |
| ३ | १ % Insurance | ४०८३७ |
| ४ | १८ % GST | ७३५०७३ |
| ५ | ३ % Contingencies | १२२५१२ |
| | Total Rs. | **५१,०८,९८५** |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: CN = NAMITA GAURAV BASER, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.05.04 11:43:02 +05'30'

(न.गौ.बसेर)
शासनाच्या उपसचिव